कुटुंब कल्याण कार्यक्रमाच्या अंमलबजावणी करिता निर्माण केलेल्या ३७ अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात दि. ०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या कालावधी करिता मुदतवाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अस्थायी २०२०/२४३/प्र.क्र.१३२/ कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीखः १८ मार्च, २०२०

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः अस्थायी -२०१९/१४२/ प्र.क्र.८९/ कु.क., दि. १७.१०.२०१९
२) सहसंचालक, आरोग्य सेवा, अर्थ व प्रशासन, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ आस्था/कक्ष ५ /टे-५/३७ अस्थायी पदे/५३१-३२/२०, दि. ०९/०३/२०२०.
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि.१२.०२.२०२०

प्रस्तावना -

कुटुंब कल्याण कार्यक्रमांच्या अंमलबजावणीकरीता कार्यरत असलेल्या ३७ अस्थायी पदांना दि.१७.१०.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि. ०१.१०.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सन २०२०-२१ या वर्षाकरीता ३७ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. संदर्भ क्र.३ अन्वये वित्त विभागाने प्रशासकीय विभागातील मंजूर अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत मुदत वाढ देण्यास मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने सदर ३७ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत २२११ लेखाशीर्षाखाली कार्यरत असलेल्या पुढील विवरणपत्रात नमूद ३७ अस्थायी पदांस दि. ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | सहसंचालक, आरोग्य सेवा,(वर्ग -१) | S-२६:८२२००-२११५०० | १ |
| २ | उप संचालक, आरोग्य सेवा, (वर्ग -१) | S-२५:५८८००-२०९२०० | २ |
| ३ | सांख्यिकी अधिकारी | S-१५:४१८००-१३२३०० | १ |
| ४ | उच्च श्रेणी लघुलेखक | S-१५:४१८००-१३२३०० | १ |
| ५ | सहाय्यक अधिक्षक | S-१३:३५४००-११२४०० | ४ |
| ६ | वाहन चालक | S-६:१९९००-६३२०० | ४ |
| ७ | सहाय्यक जिल्हा आरोग्य अधिकारी, कुटुंब कल्याण माताबाल संगोपन आणि शालेय आरोग्य, (वैद्यकीय) (वर्ग-१) | S-२३:६७७००-२०८७०० | २३ (१७ जिल्हास्तर व ६ राज्यस्तर) |
| ८ | सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, मुंबई (वर्ग-१) | S-२३:६७७००-२०८७०० | १ |
| **एकूण** | | | **३७** |

३. उपरोक्त विवरणपत्रातील नमूद ३७ पदांवरील खर्च पुढील लेखाशीर्षा अंतर्गत भागविण्यात येईल. सदर पदांवरील खर्चाची तरतूद शासनाच्या सन २०२०-२०२१ च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून केली जाईल.

१) अ.क्र. १ ते ६ मधील नमुद पदांकरिता लेखाशिर्ष:-
मागणी क्र. आर-१, मुख्यलेखाशिर्ष-२२११ - कुटुंब कल्याण, ००१- संचालन व प्रशासन, (०१) राज्य कुटुंब कल्याण केंद्र, १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना - (०१) (०२), राज्य कुटुंब कल्याण केंद्र (२२११ ००३१)

२) अ.क्र. ७ व ८ मधील नमुद पदांकरिता लेखाशिर्ष :-
मागणी क्र. आर-१, मुख्यलेखाशिर्ष - २२११, कुटुंब कल्याण, ००१- संचालक व प्रशासन, (०१) कुटुंब कल्याण केंद्र, १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०३) जिल्हा कुटुंब कल्याण केंद्र (२२११ ००५१)

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.१२/०२/२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८१५१०३७००१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7788b3b31e2d9269bcbfd9588a6ee4771341780133d295a56dd4ef476977773, serialNumber=3b8f98f1c182bf458a4deee399a7241b5044aeb09c097bc6d28b58709fe8ef0d, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2020.03.18 16:30:13 +05'30'

**(उज्वला अ. रणसिंग)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे
६. जिल्हा कोषागार अधिकारी , पुणे
७. वित्त विभाग(व्यय-१३) मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती ( कु.क.).